# महाराष्ट्र शासन

क्रमांक : संकिर्ण ०१२०/प्र.क्र. ७०/१३-स
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक- १७ जून, २०२०

<u>वाचा:</u> १. समक्रमांक दि. १८ मार्च, २०२० रोजीचे शासन आदेश.
२. महसुल व वन विभाग दि. ३१ मे, २०२० रोजीचे आदेश

ज्याअर्थी, जागतिक आरोग्य संघटनेने जगभर पसरलेला साथीचा रोग (Pandemic) म्हणून घोषित केलेला कोव्हीड-१९ (कोरोना विषाणु) देशात तसेच, महाराष्ट्रातही संक्रमित होत असल्याने, सार्वजनिक आरोग्य विभागाने राज्यात कोरोना विषाणुमुळे उद्भवणाऱ्या संसर्गजन्य आजारामुळे आरोग्यविषयक आपत्कालिन परिस्थितीत नमूद करून, दिनांक १३.०३.२०२० च्या अधिसूचनेन्वये साथरोग अधिनियम -१८९७ च्या खंड २,३ व ४ ची अंमलबजावणी राज्यात सुरू केली असणे, त्याचप्रमाणे, त्याबाबत सार्वजनिक आरोग्य विभागाने दिनांक १४ मार्च, २०२० रोजीच्या अधिसूचनेन्वये संसर्गजन्य रोगाचा प्रतिबंध व नियंत्रण यासाठी, नियम प्रसिध्द करणे,

ज्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील कलम ७३ कक मधील तरतूदीप्रमाणे राज्य शासनाला कोणत्याही नैसर्गिक आपत्तीमध्ये जनहिताच्या दृष्टीने कोणत्याही सहकारी संस्थांच्या निवडणूका पुढे ढकलण्याचा अधिकार असणे, या तरतूदीनुसार जागतिक आरोग्य संघटनेने जगभर परसलेला साथीचा रोग म्हणून घोषित केलेला कोरोना विषाणू (कोव्हीड-१९) आणि त्यामुळे उद्भवलेल्या गंभीर परिस्थिमुळे राज्यावर आलेली नैसर्गिक आपत्ती विचारात घेता विषाणूचा संसर्ग टाळण्यासाठी राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका दि. १८ मार्च, २०२० रोजीच्या शासन आदेशान्वये तीन महिन्यासाठी पुढे ढकलण्यात आलेल्या असणे,

त्याअर्थी, याबाबत सध्याच्या कोरोना विषाणू (कोव्हीड-१९) मुळे उद्भवलेल्या गंभीर परिस्थितीचा विचार करता, कोरोना विषाणू (कोव्हीड-१९) संसर्ग टाळण्यासाठी वाचा क्र. २ येथील दि. ३१ मे, २०२० रोजीच्या आदेशान्वये राज्याचा लॅाकडाऊन कालावधी दि. ३० जून, २०२० पर्यंत वाढविण्यात आला आहे. तसेच अद्यापही साथीचा रोग आटोक्यात येण्यास काही अवधी लागणार आहे. त्याचप्रमाणे रुग्णांच्या संख्येत दिवसेंदविस वाढ होत आहे. अशावेळी राज्यातील सहकारी संस्थांच्या निवडणूका घेणे उचित होणार नाही. या निवडणूका निर्भय, मुक्त व पारदर्शक वातावरणात घेण्याच्या दृष्टीकोनातून राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कक मधील तरतूदीनुसार ज्याप्रकरणी मा.उच्च / सर्वोच्च न्यायालयाने निवडणूक घेण्याचे आदेशीत केले आहे, अशा सहकारी संस्था वगळून

राज्यातील सर्व सहकारी संस्थांच्या निवडणूका या आदेशाच्या दिनांकापासून ज्या टप्प्यावर असतील त्या टप्प्यावर पुढील तीन महिन्यांपर्यंत पुढे ढकलण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६१७१६४२३१३६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.06.17 16:48:58 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, पुणे.
४. विभागीय सहनिबंधक/उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
५. निवडनस्ती, कार्यासन १३-स.